महिला व बाल विकास विभाग (खुद्द) व विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांसाठी M/s Ernst & young LLP संस्थेच्या एकूण ६ सल्लागारांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : आस्था-२०२४/प्र.क्र.७७/का-१
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ८ एप्रिल, २०२४.

संदर्भ :- १) माहिती व तंत्रज्ञान विभागाचा शासन निर्णय क्र.GAD-मातंस-०८०/४/२०१४-०/० Directorate of IT (MH), दि.५/१०/२०२३.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन पत्र क्रमांक - आस्था-२०२४/प्र.क्र.७७/का-१, दि.०८.०४.२०२४

प्रस्तावना:-

महिला व बाल विकास विभाग व त्याच्या अखत्यारीतील क्षेत्रिय कार्यालये, महामंडळ, आयोग इ. करीता संगणकीकरण / ई गव्हर्नन्स प्रकल्प अंमलबजावणीकरीता सर्व क्षेत्रिय कार्यालयांकरीता संगणक विषयक प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी विभागाच्या दिनांक २४ मे २०१३ च्या शासन निर्णयानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीने दिलेल्या मान्यतेनुसार या विभागाच्या दिनांक ०२ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये KPMG या संस्थेच्या ५ सल्लागारांची दिनांक ०१/०१/२०१९ ते दि.३१/१२/२०२१ या ३ वर्षांच्या कालावधीसाठी नेमणूक करण्यात आली होती. सदर पदांना वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली असून त्यानुसार दि. ३१.३.२०२४ पर्यंत या पदांना मुदतवाढ देण्यात इ. आली आहे.

२. आता माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाच्या दि. ५.१०.२०२३ च्या शासन निर्णयानुसार शासनाच्या ई-गर्व्हनन्स प्रकल्पासाठी माहिती व तंत्रज्ञान सल्लागारांची नियुक्ती करण्यासाठी एकूण ६ संस्थांना मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार या ६ संस्थापैकी एका संस्थेची निवड करण्याकरिता दि. १९.३.२०२४ रोजी प्रकल्प अंमल बजावणी समितीची बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार M/s Ernst & young LLP संस्थेकडून माहिती व तंत्रज्ञान सल्लागारांच्या सेवा उपलब्ध करून घेण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

महिला व बाल विकास विभाग खुद्द व विभागाच्या अधिपत्याखालील महिला व बाल विकास आयुक्तालय आणि आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांच्या कार्यालयांच्या ई-गर्व्हनन्स प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी दि. १.४.२०२४ ते दि. ३१.३.२०२५ या १ वर्षाच्या कालावधीकरिता खालील

तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे माहिती व तंत्रज्ञान सल्लागारांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सल्लागाराचे पद | कामाचा अनुभव | अनुज्ञेय मासिक मानधन + वस्तु व सेवाकर (१८%) | एकूण पदे | एकूण मासिक मानधन + वस्तु व सेवा कर (१८%) |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्रधान सल्लागार | १३ वर्षापेक्षा जास्त | ४,५४,०००/- | २ | ९,०८,०००/- |
| २ | वरिष्ठ सल्लागार | ९ ते १३ वर्षे | ३,८५,०००/- | १ | ३,८५,०००/- |
| ३ | सल्लागार | ५ ते ९ वर्षे | ३,४५,०००/- | २ | ६,९०,०००/- |
| ४ | असोसिएट सल्लागार | २ ते ५ वर्षे | २,८५,०००/- | १ | २,८५,०००/- |
| | एकूण... | | | | २२,६८,०००/- |

२. उपरोक्त नमूद सल्लागारांची नियुक्ती पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

i. सदर सर्व सल्लागारांनी कार्यालयीन वेळेत कार्यालयात उपस्थित राहणे आवश्यक राहील. त्यासाठी दररोज सकाळ/संध्याकाळ त्यांनी हजेरीपटावर सही करणे आवश्यक राहील. तसेच त्यांनी किरकोळ अथवा दीर्घकाळासाठी रजा हवी असल्यास उप सचिव, आस्थापना यांचेकडे अर्ज सादर करणे आवश्यक राहील.

ii. सदर सल्लागारांनी विभागामध्ये कार्यरत सर्व संकेतस्थळांचे कामकाज व्यवस्थित चालू आहे किंवा नाही, यावर लक्ष ठेवून त्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करणे

iii. विविध प्रशासकीय विभागांनी विकसित केलेल्या संगणक प्रणालीच्या अनुषंगाने करावयाचे कामकाज पार पाडण्यास सहाय्य करणे तसेच या प्रणालीमध्ये उद्भवणाऱ्या समस्यांचे निराकरण करणे, उदा. ई-ऑफिस, पीएफएमएम, ई-एच.आर.एम.एस., महापार, क्युसीआय, जीईएम पोर्टल इ.

iv. विभागामार्फत हाताळण्यात येणाऱ्या विषयांसंदर्भात संबंधित कार्यालयांसोबत ऑनलाईन बैठकांचे आयोजन करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करणे.

v. सदर सल्लगारांनी प्रत्येक महिन्याच्या अखेरीस त्यांनी केलेल्या कामकाजाची माहिती उ.स. आस्थापना यांचेमार्फत सचिव, महिला व बाल विकास यांना सादर करणे. सदर अहवाल प्राप्त झाल्यानंतरच त्या महिन्याचे वेतन अदा करण्यास मंजूरी देण्यात येईल.

vi. नियुक्त करण्यात आलेल्या सेवा पूरवठादार संस्थेस माहिती व तंत्राज्ञान विभागाच्या दि.५.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयात नमुद सर्व अटी शर्ती लागू राहतील त्यासाठी विभागाकडून कोणताही स्वतंत्र करार करण्याची अवश्यकता राहणार नाही तसेच नियुक्त सल्लागार सेवा पुरविण्यास असमर्थ ठरल्यास या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-४ नुसार मासिक मानधनामधून दंडात्मक वसुली करण्यात येईल.

३. या सल्लागारांच्या मानधनच्या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक X-२, २२५१ सचिवालय सामाजिक सेवा (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्प, (०१)(०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम), १७ संगणक खर्च ( २२५१ ०८७५ ) अंतर्गत सन २०२४-२५ या वर्षी उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४१०१५३६४७२८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.04.10 15:50:36 +05'30'

(वि. रा. ठाकूर)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६) प्रधान सचिव, (मा.तं.), माहिती व तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, बेलापूर, नवी मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
११) सह सचिव/ उप सचिव, वित्त विभाग, (व्यय-६) / नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
१२) राज्य सूचना अधिकारी (NIC), नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई.
१३) सह संचालक (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
१४) व्यवस्थापक KPMG कंपनी, मुंबई / संबंधित KPMG कंपनीचे सल्लागार.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई.
१७) निवडनस्ती (का-१),महिला व बाल विकास विभाग. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.